**उद्योग उपसंचालक (तां) गट-अ या संवर्गातील पदांवर पदोन्नती देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय क्र. पदोन्न-२०२१/८५/प्र.क्र.२६/उद्योग-३,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगूरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- १८ नोव्हेंबर, २०२१

वाचा : १. सामान्य प्रशासन शा.नि. क्र. एसआरव्ही-२०८/प्र.क्र.१५९/कार्या.१२,दि.१.०८.२०१९
२. शासन निर्णय क्र. पदोन्न-१४१७/११९/प्र.क्र.३३/उद्योग-३, दि.२.६.२०१७
३. शासन निर्णय क्र. पदोन्न-१४१८/४४८/प्र.क्र१०१/उद्योग-३, दि.३१.१२.२०१८
४. उद्योग संचालनालयाचे पत्र क्र. उसं/आस्था/पदोन्नती/अउअ-उउसं/७५४/२०२१/अे-८८२,दि. ०५.१०.२०२१

**शासन निर्णय :-**

उद्योग संचालनालयांतर्गत उद्योग अधिकारी (तां) गट-ब (वेतनश्रेणी एस-१५ : ४१८००-१३२३००) या पदावरुन उद्योग उपसंचालक (तां) गट-अ (वेतनश्रेणी एस-२० : ५६१००-१७७५००) या पदावर निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात खालील अधिकाऱ्यांना पदोन्नती देण्यात येत असून त्यांची पदस्थापना त्यांच्या नावासमोर स्तंभ क्रमांक ३ येथे दर्शविलेल्या ठिकाणी करण्यास, खालील परिच्छेद क्र.२ येथे नमूद अटींच्या अधीन राहून शासन मान्यता देण्यात येत आहे.

**पदोन्नतीनंतरची पदस्थापना**

| अ. क्र. | अधिकाऱ्यांचे नाव | पदस्थापनेचे ठिकाण | शेरा |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | श्रीमती संगीता गजानन हिवाळे, मैत्री कक्ष, मुंबई | मुख्यालय, मुंबई | रिक्त पदी |
| २ | श्रीमती विद्या गजानन कुलकर्णी, व्यवस्थापक, जिऊकें, सांगली | जिल्हा उद्योग केंद्र, रत्नागिरी | रिक्त पदी |
| ३ | श्रीमती सिमा विलास पवार, व्यवस्थापक, जिऊकें, नाशिक | विभागीय कार्यालय, ठाणे | रिक्त पदी |
| ४ | श्री.श्रीपाद शंकर दामले, व्यवस्थापक, जिऊकें, कोल्हापूर | जिल्हा उद्योग केंद्र, सिंधुदूर्ग | रिक्त पदी |
| ५ | श्री.गुरुशांतप्पा शरणप्पा हरळ्या, व्यवस्थापक,जिऊकें, पालघर | जिल्हा उद्योग केंद्र, रायगड | रिक्त पदी |
| ६ | श्री.अतुल दत्तू दवंगे, व्यवस्थापक,जिऊकें,नाशिक | जिल्हा उद्योग केंद्र, अहमदनगर | रिक्त पदी |

२. उपरोक्त तक्त्यात नमूद अधिकाऱ्यांची पदोन्नती ही खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून करण्यात येत आहे.

१) सदर पदोन्नती मा. सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्र.२८३०६/२०१७ च्या अधिन राहून पदोन्नतीच्या कोटयातील सर्व रिक्त पदे दि.२५.५.२००४ स्थित सेवाज्येष्ठतेनुसार, भरण्याबाबत साप्रवि/१६-ब, कार्यासनाच्या दि.७.०५.२०२१ च्या शासन निर्णयानुसार दिलेल्या सूचनानुसार सदरची पदोन्नती निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात देण्यात येत आहे.

२) सदर पदोन्नती महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या मान्यतेच्या अधीन राहून करण्यात येत आहेत.

३) सदर अधिकारी यांनी सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्र. वशिअ-१२१४/ प्र.क्र.२६/११, दि.२.०६.२०१४ नुसार पदोन्नतीच्या पदावर रुजू होण्यापूर्वी अद्ययावत मत्ता व दायित्वाचे विवरणपत्र विकास आयुक्त (उद्योग) उद्योग संचालनालय, मुंबई यांना सादर करणे अनिवार्य राहील.

४) संबधित अधिकाऱ्यांनी त्यांच्या सध्याच्या पदाचा कार्यभार विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई यांच्या आदेशानुसार अन्य अधिकाऱ्यांकडे सोपवून पदोन्नती पदावर तात्काळ रुजू व्हावे व रुजू अहवाल शासनास सादर करावा.

५) संबंधित अधिकारी ज्या दिनांकास पदोन्नतीच्या पदावर रुजू होतील त्या दिनांकापासून त्यांना पदोन्नती विषयक लाभ अनुज्ञेय होतील.

६) संदर्भ क्रमांक २ येथील आदेशान्वये उद्योग उपसंचालक (तां) गट-अ या संवर्गात देण्यात आलेली तदर्थ पदोन्नती या आदेशाच्या दिनांकापासून अट क्र.२ च्या अधीन राहून नियमित करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

७) तसेच, संदर्भ क्रमांक ३ येथील आदेशातील श्री. कि.व.जाधव व श्री.प्र.द.हणबर यांना वगळून उर्वरित ४ अधिकाऱ्यांची तदर्थ पदोन्नती या आदेशाच्या दिनांकापासून अट क्र.२ च्या अधीन राहून नियमित करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

३. विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई यांनी संबंधित अधिकारी पदोन्नतीच्या पदावर रुजू होण्याच्या दृष्टीने आवश्यक ती कार्यवाही करावी व त्याबाबतचा कार्यपालन अहवाल शासनास सादर करावा.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२१११९८१६५५१०९९५१० असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Ravindra V Gurav

Digitally signed by Ravindra V Gurav
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY, LABOUR DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0030b22364370f4d96ab251b7263219586c0069b661c3f9cd6fd67e55000ce92, pseudonym=B67CC3974B29D17A658E4CE714FCD068FD7E189B, serialNumber=9DFB7AEFBD9E82B129C324D567B46E1D853D93C38D6E222C868EAC72ECD12784, cn=Ravindra V Gurav
Date: 2021.11.18 16:55:00 +05'30'

**( रविंद्र गुरव )**
शासनाचे सह सचिव

**प्रत,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
२. मा.मंत्री (उद्योग) यांचे खाजगी सचिव.
३. मा.राज्यमंत्री (उद्योग) यांचे खाजगी सचिव.
४. अपर मुख्य सचिव (उद्योग) यांचे स्वीय सहायक.
५. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राने *)
६. विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई.
७. उप सचिव, सामान्य प्रशासन विभाग (१२/१६ब ), मंत्रालय, मुंबई.
८. उद्योग सह संचालक, सर्व विभागीय कार्यालये.
९. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२(लेखा व अनुज्ञेयता /लेखा परीक्षा), मुंबई /नागपूर.
१०.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
११.निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१२.संबधित जिल्हा कोषागार अधिकारी.
१३.सर्व महाव्यवस्थापक, जिल्हा उद्योग केंद्र,
१४.संबधित अधिकारी (उद्योग संचालनालय, मुंबई) यांचे मार्फत
१५.मैत्री कक्ष,बलार्ड इस्टेट, मुंबई उद्योग विभागाच्या संकेतस्थळावर प्रसिध्दीसाठी
१६.निवड नस्ती (उद्योग-३).